**राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत पशुवैद्यक पदवी/ पदवीकाधारक सुशिक्षित बेरोजगारांमार्फत गाई म्हशींमध्ये शेतकऱ्यांच्या दारात कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करुन देणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - संकिर्ण - २००९ / प्र.क्र.३२३ / पदुम - ४**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : २३ एप्रिल, २०१०**

**वाचा :** १) आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र. एफवायपी-११(०८) /सीआर-१३५/१११३-१४/२००८/पंस-६ दि. १२ मे, २००८

२) राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांचे पत्र क्र. एम.ई.टी-१००८ प्र.क्र.७८/राकृवियो कक्ष दि.२१/११/२००८ अन्वये राज्यस्तरीय मंजूरी समितीच्या दिनांक ७/११/२००८ रोजी आयोजित सभेचे इतिवृत्त.

३) आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र. एफवायपी -११ (०९) ९१०/ २००९/पंस-६ दिनांक ८ जुलै, २००९.

४) राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांचे शासन निर्णय क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.९०/राकृवियो कक्ष दि.३१ मार्च, २०१०

५) आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र. एफवायपी-११(०९)/सीआर-६०९/राकृवियो/२०१०/पंस-६ दिनांक ०७ एप्रिल, २०१०

**प्रस्तावना :**

राज्यात २००३ च्या पशुगणनेनुसार ८७.४४ लक्ष पैदासक्षम गाई / म्हशींची संख्या असून शासकीय व सेवाभावी संस्था कडून या पैकी जवळ पास २८ टक्के गाई / म्हशीना कृत्रिम रेतनाच्या सुविधा देण्यात येत आहेत. ११ व्या पंचवार्षिक योजनेअंतर्गत कृषि व संलग्न क्षेत्राचा विकास दर ४ टक्के गाठण्याचे धोरण शासनाने ठरविले आहे. यासाठी संकरित पैदासीद्वारे दुध उत्पादनात वाढ होवून ग्रामीण भागात रोजगार निर्मितीस चालना मिळण्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत पशुवैद्यक पदवी / पदवीका धारक सुशक्षित बेरोजगारांमार्फत गाई / म्हशींमध्ये शेतकऱ्याच्या दारात कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करुन देण्याच्या योजनेस आयुक्त पशुसंवर्धन यांनी संदर्भ ४ येथील आदेशान्वये या योजनेस तांत्रिक मंजूरी प्रदान केलेली आहे.

**<u>शासन निर्णय</u> :**

११ व्या पंचवार्षिक योजनेच्या सन २००९-१० ते २०११-१२ या कालावधीत राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत **"पशुवैद्यकीय पदवी / पदवीकाधारक सुशिक्षित बेरोजगारांमार्फत गाई / म्हशींमध्ये शेतकऱ्यांच्या दारात कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करुन देणे"** या योजनेस याद्वारे शासनाची प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. या योजनेचे सनियंत्रण आयुक्त पशुसंवर्धन हे करतील तर योजनेची अंमलबजावणी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला हे करतील.

**३. योजनेचे आर्थिक निकष :**

३.१ या योजनेअंतर्गत शेतकऱ्याच्या दारात कृत्रिम रेतनाच्या सेवा देण्याऱ्या पशुवैद्यक पदवी/ पदविकाधारकास **"सेवादाता"** असे संबोधण्यात यावे.

३.२ सेवादात्यास कृत्रिम रेतन व जन्मलेली संकरीत वासरे /सुधारीत जातींच्या पारडयांच्या पडताळणी नंतर त्यांना खालील प्रमाणे **"प्रोत्साहनपर रक्कम"** देय राहील.

| | प्रति कृत्रिम रेतनासाठी देय प्रोत्साहनपर रक्कम (रुपये) | | जन्मलेल्या प्रति संकरित वासरासाठी / म्हशीच्या सुधारित पारडयासाठी देय प्रोत्साहनपर रक्कम (रुपये) | |
|---|---|---|---|---|
| | नक्षलग्रस्त / आदिवासी भागासाठी | इतर भागासाठी | नक्षलग्रस्त /आदिवासी भागासाठी | इतर भागासाठी |
| प्रथम कृत्रिम रेतनासाठी | १२५ | १०० | ५५० | ५०० |
| व्दितीय कृत्रिम रेतनासाठी | १०० | ७५ | ४५० | ४२५ |
| तृतीय कृत्रिम रेतनासाठी | ७५ | ५० | ३७५ | ३७५ |

३.२.१ **सेवा दात्यांना त्यांनी केलेल्या कृत्रिम रेतन कार्य व जन्मलेल्या वासरांसाठी द्याव्या लागणा-या प्रोत्साहनपर रकमेसाठी, त्यांनी केलेल्या तांत्रिक कामाच्या मासिक अहवालानुसार व पडताळणीनुसार जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांनी यासाठी लागणा-या निधीची मागणी आयुक्त पशुसंवर्धन यांच्याकडे करावी. आयुक्त पशुसंवर्धन यांनी एकत्रित मागणी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांच्याकडे दरमहा करावी. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ यांनी त्या प्रमाणे प्रोत्साहनपर रकमेचा निधी आयुक्त पशुसंवर्धन यांना उपलब्ध करून द्यावा व आयुक्त पशुसंवर्धन यांनी सदरचा निधी संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्तांना वितरीत करावा. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांनी सेवादात्यांना प्रोत्साहनपर रक्कम बँक अकाउंट द्वारे अदा करावी.**

३.२.२ कृत्रीम रेतन कार्याच्या अनुषंगाने ठेवावयाच्या तांत्रीक नोदवहया, मासिक अहवालाचे प्रपत्र इ. अभिलेखे व जन्मलेल्या वासरांच्या कानावरील टॅगींग करीता रक्कम रु. ५०/- प्रती वासरु या प्रमाणे देय राहील.

३.२.३ सेवादात्यांना कृत्रिम रेतन कार्यासाठी लागणा-या मुलभूत सुविधा म्हणजेच संच (द्रवनत्रपात्र, एआय गन, ट्रे इ. जडसंग्रहात मोडणा-या बाबी) व सामुग्री (गोठीत रेत मात्रा, द्रवनत्र, शिथ इ. केंद्र शासनाने विहित केलेल्या एसओपी मध्ये समाविष्ठ बाबी) याचा पुरवठा १०० टक्के अनुदानावर योजना कालावधीत करण्यात यावा.

३.२.४ सेवादात्याने कृत्रिम रेतना पोटी संबंधित जिल्ह्यात प्रचलित असलेल्या सेवाशुल्कच्या दराने (रू २०+१ = २१/-) शेतक-याकडून फी ची वसुली करावयाची असून जमा केलेल्या फी चा भरणा त्यांना निवडून देण्यात आलेल्या नजिकच्या पशुवैद्यकीय दवाखान्यामध्ये दरमहा करावा.

**३.२.५ सेवादात्यांनी मासिक अहवालात केलेल्या कृत्रिम रेतनाची रॅन्डम पध्दतीने पडताळणी (शेतकरी/ पशुपालकांची प्रत्यक्ष भेट घेऊन) नजीकच्या पशुवैद्यकीय संस्थेवरील अधिकारी/ कर्मचारी यांनी केल्यानंतर व तसे प्रमाणपत्र त्यांचेकडून प्राप्त झाल्यानंतरच सेवादात्यास कृत्रिम रेतन कार्याची प्रोत्साहनपर रक्कम अदा करण्यात यावी.**

३.२.६ सेवादात्यांमार्फत केलेल्या कृत्रिम रेतना पासून जन्मलेल्या संकरित वासरांची/ म्हशीच्या सुधारीत पारडयांची १०० टक्के पडताळणी नजीकच्या पशुवैद्यकीय संस्थेवरील अधिकारी/ कर्मचारी यांनी केल्यानंतर व तसे प्रमाणपत्र त्यांचेकडून प्राप्त झाल्यानंतरच सेवादात्यास वासरु जन्मल्यानंतर त्यासाठीचे प्रोत्साहनपर रक्कम अदा करण्यात यावे.

३.२.७ **सेवादात्यांमार्फत केलेल्या कृत्रिम रेतनाचा व जन्मलेल्या वासरांचा केंद्रनिहाय डाटा आयुक्त पशुसंवर्धन यांनी विहित केलेल्या नमुन्यात ऑनलाईन ठेवणे बंधककारक आहे. या संदर्भात आयुक्त पशुसंवर्धन यांनी क्षेत्रिय अधिका-यांना आवश्यक त्या सुचना निर्गमित कराव्यात.**

३.२.८ सेवादात्यांमार्फत करण्यात आलेल्या कृत्रीम रेतनाची नोंद नजिकच्या पशुवैद्यकीय संस्थेकडे १ महिण्याच्या आंत करावी. व अशा कृत्रिम रेतना नंतर जन्मलेल्या वासरांसाठी प्रोत्साहनपर रक्कम मिळण्यासाठीचा दावा सोबतच्या परिशिष्ट अ या विहीत नमुण्यात सेवादात्यांनी करावा व तो नजिकच्या पशुसंवर्धन विभागाच्या संस्थेतील अधिका-यांनी पडताळणी करावा. सदर दाव्यावर जन्मलेल्या वासराचे त्याच्या मालका सोबत छायाचित्र असणे बंधन कारक आहे. सेवादात्यांनी केलेल्या कृत्रिम रेतनाचा व त्या पासून जन्मलेल्या वासरासाठी दयावयाच्या प्रोत्साहनपर रक्कमेची मागणी केल्या नंतर ३० दिवासांच्या आंत त्यांनी केलेल्या कामाची पडताळणी नजिकच्या पशुवैद्यकीय संस्थानी / विस्तार अधिका-यांनी करुन त्यांना देय असलेले प्रोत्साहनपर रक्कम देण्यासाठी जिल्हा पशुसवंर्धन उपायुक्त यांचेकडे अहवाल सादर करण्यात यावा. असा अहवाल ३० दिवसाच्या आत संबंधिताकडून दिला गेला नसल्यास संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचे जबाबदारीवर ही रक्कम अदा करण्यात यावी.

३.२.९ या कार्यक्रमातील कृत्रिम रेतनाचे अभिलेख, कृत्रिम रेतना नंतर जन्मलेल्या वासरांचा, जन्मलेल्या वासराची सदयस्थिती इत्यादीची ३ वर्षा पर्यंत नोंद ठेवण्यासाठी संगणक प्रणाली तयार करावी व ही प्रणाली स्वयंसेवी संस्थाद्वारे, पशुवैद्यक पदवि / पदविकाधारक सुशिक्षित बेरोजगारांमार्फत तसेच पशुसंवर्धन विभागातील संस्था मार्फत केल्या जाणा-या कृत्रिम रेतन कार्यासाठी सारखीच असावी. आणि या प्रणालीवर नोंदविण्यात आलेल्या कृत्रिम रेतनाचाच मोबदल्याच्या दाव्याकरिता विचार करण्यात यावा.

३.२.१० या योजनेसाठी लागणा-या संच व सामुग्रीचा (अ.क्र. ३.२.३ प्रमाणे) दर करार मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला हे करतील.

४. कृत्रिम रेतन कार्यासाठी सेवादात्याची निवड ही आयुक्त पशुसंवर्धन यांच्या मार्फत जाहीरात देण्यात येऊन करण्यात येईल. सेवादाता हा पशुवैद्यकीय पदवीधर / पदविकाधारक असणे बंधनकारक राहील.

५. सेवादात्यांच्या निवडीसाठी वर्तमानपत्रात आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य पुणे यांचे कार्यालयामार्फत जाहीरात प्रसिध्द करण्यात यावी. तसेच ही जाहिरात आयुक्त पशुसंवर्धन कार्यालयाच्या संकेत स्थळावर देखील प्रसिध्द करण्यात यावी.

६. सदर जाहिराती नुसार पशुवैद्यकीय पदवीधर / पदविकाधारक यांच्या सेवादाता म्हणून निवडीसाठी करावयाचे अर्ज त्यांनी त्यांच्या जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांचेकडे विहित मुदतीत सादर करावेत.

७. अर्ज सादर केलेल्या उमेदवारांना त्या त्या जिल्हयांचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांचे कार्यालयात मुलाखतीसाठी निश्चित तारीख व वेळ देवून बोलाविण्यात यावे. मुलाखतीच्या तारखेची व वेळेची माहिती अर्जदारास पत्राद्वारे कळवावी व त्याप्रमाणे ती वेबसाईटवर देखील प्रसिध्दी करण्यात यावी. सेवादाता म्हणून निवड केलेल्या उमेदवरांची यादी मुलाखत झाल्यापासून २४ तासाच्या आंत कार्यालयाच्या नोटीस बोर्डावर लावण्यात यावी व वेबसाईवर प्रसिध्द करावी. तसेच निवड केलेल्या उमेदवारांना लेखी पत्राद्वारे देखील कळविण्यात यावे.

**८. सेवादात्याची निवड खालील समितीद्वारे करण्यात यावी.**

| | |
|---|---|
| जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त | अध्यक्ष |
| जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| पशुधन विकास अधिकरी, जिल्हा कृत्रिम रेतन केंद्र | सदस्य |
| कार्यालय अधिक्षक | सदस्य |
| सहाय्यक आयुक्त जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालय | सदस्य सचिव |

९. सन २००० - २००१ या वर्षात रोजगार व स्वयंरोजगार योजनेअंतर्गत पदवी / पदवीकाधारक सुशिक्षित बेरोजगारांच्या चालू / बंद केंद्राच्या सुशिक्षित बेरोजगारांनी या योजनेत अर्ज केला असल्यास त्यांना प्राधान्य देण्यात यावे. उच्च शैक्षणिक अर्हता, पुर्वानुभव व मुलाखत याद्वारे उमेदवारांची निवड करण्यात यावी व स्थानिक उमेदवरांना प्राधान्य देण्यात यावे.

१०. या योजनेत सेवादात्यांची निवड **"कामाप्रमाणे मोबदला"** या तत्वावर करण्यात यावी.

११. निवड केलेल्या सेवादात्यांकडून रु. ५०००/- (अक्षरी रुपये पांच हजार फक्त) सुरक्षा ठेव म्हणून डी.डी. च्या स्वरुपात संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांनी घ्यावी. योजना कालावधी संपल्यानंतर संच व सामुग्री सुस्थितीत परत मिळाल्यानंतर सदरची सुरक्षा ठेव संबंधित सेवादात्यास परत करण्यात यावी.

**१२. या योजने अंतर्गत निवड केलेल्या सेवादात्यांना योजनेचा कालावधी संपल्या नंतर किंवा योजना कालावधीत शासकीय सेवेत सामावून घेतले जाणार नाही.**

१३. या योजनेत निवड केलेल्या सेवादात्यांचे एकूणच कामकाज समाधानकारक नसल्याचे आढळून आल्यास संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त हे कसलीही पूर्व सुचना न देता सेवादाता म्हणुन त्यांची केलेली निवड तात्काळ संपूष्टात आणतील.

१४. आयुक्त पशुसंवर्धन यांनी एम आर सॅक किंवा इतर संस्थेशी तात्काळ संपर्क साधून राज्यातील सर्व तालुक्यांचे नकाशे तयार करुन प्रजननक्षम गायी / म्हशींच्या संख्येनुसार गावे निश्चित करावी व कोणकोणत्या गावात शासनाच्या पशुवैद्यकीय संस्थेमार्फत, पशुवैद्यक पदवी / पदविकाधारक सेवादात्यांमार्फत व स्वयंसेवी / सेवाभावी संस्थामार्फत कृत्रीम रेतनाच्या सेवा उपलब्ध करुन दिल्या जातील याचा आराखडा तयार करावा व त्याअनुषंगाने केंद्र शासनाकडून राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी व उपलब्ध होणा-या निधीच्या अधिन राहून पशुवैद्यक पदवी / पदवीकाधारक सेवादाता तसेच स्वयंसेवी/ सेवाभावी संस्थांची कीती केंद्र स्थापन करावयाची हे निश्चित करावे.

१५. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा कृत्रीम रेतन केंद्र यांच्या समितीने जिल्हयांतील कार्यरत पशुवैद्यकीय संस्थांसाठी १००० पैदासक्षम गायी / म्हशींच्या संख्येच्या मर्यादेत गावांचे कृत्रिम रेतन कार्यासाठी कार्यक्षेत्र निश्चित करावे. इतर गावांत कृत्रिम रेतनाच्या सुविधा उपलब्ध करण्यासाठी प्रजननक्षम गायी / म्हशींच्या संख्येनुसार स्वयंसेवी /सेवाभावी संस्थांच्या आणि सेवादात्यांच्या कृत्रिम रेतन केंद्राच्या मुख्यालयाचे ठिकाण व त्याचे कार्यक्षेत्र निश्चित करावे व त्यास आयुक्त पशुसंवर्धन यांची मान्यता घेऊन सदर केंद्रे कार्यान्वीत करण्यात यावीत.

१६. सेवादात्यांमार्फत केलेल्या कृत्रिम रेतन कार्याची तसेच कृत्रिम रेतनानंतर जन्मलेल्या वासरांची रॅन्डम पध्दतीने १० टक्के पडताळणी करण्यात यावी. सदरची पडताळणी जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद/ जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त / प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त यांनी त्यांच्या दै-याचे वेळी करावी. पडताळणीचा अहवाल प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त यांनी दरमहा आयुक्त पशुसंवर्धन यांच्याकडे सादर करावा. त्याचप्रमाणे हा अहवाल आयुक्त पशुसंवर्धन यांनी **ऑनलाईन** उपलब्ध होईल असे पहावे.

१७. या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी व योजनेचे उद्‍िष्ट साध्य करण्यासाठी आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सूचना ( अर्ज मागविणे, सेवादात्यांची निवड प्रक्रिया, सेवादात्यांकडून बंधपत्र घेणे, तांत्रिक कामाचा अहवाल , कृत्रि आराखडा इत्यादी ) आयुक्त पशुसंवर्धन यांनी योजनेतील आर्थिक निकषाच्या अधिन राहून त्यांचे स्तरावरुन सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

१८. हा कार्यक्रम प्रभावीपणे राबविणेसाठी कार्यक्षेत्रामधील बेरड वळुंचे खच्चीकरण करण्यासाठी जवळच्या पशुवैद्यकीय संस्थेमार्फत विशेष कार्य मोहिमांचे आयोजन करण्यात यावे.

१९. सदर योजना राबविताना आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला यांनी योजनेची अंमलबजावणी/सनियंत्रण आणि मुल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय आयुक्त(कृषि), महाराष्ट्र राज्य व महाराष्ट्र राज्य छोट्या शेतक-यांचा कृषि व्यापार संघ, पुणे यांच्याशी ठेवावा.

२०. या योजने अंतर्गत उपलब्ध होणारा निधी तात्काळ उपयोगात आणावा.

२१. सदर निधी उपयोगात आणताना राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीतील निर्णय व या योजने संबंधीच्या केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार खर्च करावा.

२२. या योजने अंतर्गत उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या विनियोगा बाबतचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

२३. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२००९/प्र.क्र.३२२/पदुम-४, दि. २० जून २००९ अन्वये गठित केलेल्या राज्य संनियंत्रण समिती व जिल्हास्तरीय संनियत्रण समिती द्वारे सदर योजनेचे सनियंत्रण करण्यात यावे.

२४. या योजनेच्या कालावधीत तसेच योजना कालावधी संपल्यानंतर योजनेचे मुल्यमापन करण्यासाठी खालील प्रमाणे मुल्यमापन समितीचे गठण करण्यात येत आहे. सदर समितीने वेळोवेळी शासनास मुल्यमापन अहवाल सादर करावा.

**मुल्यमापन समिती**

| | | |
|---|---|---|
| १) | अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणें | अध्यक्ष |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला | सदस्य |
| ३) | सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय) आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणें | सदस्य |
| ४) | प्रार्देशिक पशुसंवर्धन सहआयुक्त अमरावती विभाग, अमरावती | सदस्य |
| ५) | जिल्हा पशुंसवंर्धन उपायुक्त, परभणी | सदस्य |
| ६) | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे | सदस्य |
| ७) | पशुसवंर्धन उपायुक्त (नियोजन व अंदाज) आयुक्त पशुसंवर्धन कार्यालय, पुणें | सदस्य सचिव |

तसेच या योजनेचे मुल्यमापन नॅबकॅान, ॲग्रीकल्चर फायनान्स कार्पोरेशन इ. बाह्यसेवी संस्थामार्फत सुध्दा करण्यात यावे व या संस्थेने केलेला मूल्यमापन अहवाल आयुक्त पशुसंवर्धन यांचे अभिप्रायासह शासनास सादर करण्यात यावा.

२५. सेवादात्यांच्या प्रत्येक ५ ते ६ केंद्रावर पर्यवेक्षण करण्यासाठी पशुसवंर्धन विभागातील जवळच्या पशुवैद्यकीय संस्थेवरील अधिकारी / कर्मचारी यांची नेमणूक करण्यासाठी आयुक्त पशुसंवर्धन यांनी क्षेत्रीय अधिका-यांना आवश्यक त्या सुचना तात्काळ दयाव्यात.

२६. कृत्रिम रेतन कार्याच्या नोंदीसाठी शेतक-यांना / पशुपालकांना ए.आय. कार्ड देण्यात यावे.

२७. सेवा दात्याने योजनेच्या कालावधीत (सन २०१०-११ ते २०११-१२ अखेर) केलेल्या कृत्रिम रेतनापासून किमान १२५ संकरीत वासरांची / सुधारीत म्हशींच्या पारडयाची पैदास झाली तर त्याला या योजनेत दिलेले कृत्रिम रेतन संच व इतर साहित्य शासनाकडे परत जमा न करुन घेता त्यांना याचा वापर योजना कालावधी संपल्यानंतर स्वखर्चाने कृत्रिम रेतनाच्या सुविधा शेतक-यांना उपलब्ध करुन देण्यासाठी करता येईल.

सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९९/१४३१, दि१८/०२/२०१० तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५७/२०१०/व्यय-२, दि. २९/०३/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक **२०१००४२६१२५६२६००१** आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

सही/-
**( प्रणाली चिटणीस )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहिती व योग्य त्या कार्यवाहीस्तव -**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
अवर सचिव, मा. मुख्य सचिव यांचे कार्यालय
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव, (कृषि व फलोत्पादन ), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई
आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य पुणे, (५ प्रती)
आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य पुणे
आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सह सचिव (राकृवियो) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई
जिल्हाधिकारी, सर्व
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य पुणे,
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला,
उप सचिव (दुग्धव्यवसाय ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, सर्व विभाग,
जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सर्व
विभागीय व्यवस्थापक, गोठीत रेत प्रयोगशाळा, पुणे/नागपूर/औरंगाबाद (हर्सुल)
अधिक्षक कृषि अधिकारी, सर्व
जिल्हा दुग्धव्यवसाय अधिकारी,
जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
पशुधन विकास अधिकारी, जिल्हा कृत्रिम रेतन केंद्र सर्व
कार्यासन अधिकारी, पदुम-१/पदुम-३/पदुम-१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.